**शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना व शिक्षकांना संगणक प्रशिक्षण देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - शाआशा-२००३/प्र.क्र.१२३ /का.१३**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.**
**दिनांक : १ सप्टेंबर, २००४.**

**वाचा :** १) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.संप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/बारा, दिनांक ३.५.१९९९.

२) शासन परिपत्रक क्रमांक सामान्य प्रशासन विभाग, संप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/बारा, दिनांक ३ मे,२०००.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-१०००/प्र.क्र.१४३/३९, दिनांक १०.७.२०००

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक ७.८.२००१.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/ २००१/३९, दिनांक २०.७.२००२

६) शासन निर्णय क्रमांक, आदिवासी विकास विभाग क्रमांक : शाआशा-२००२/ प्र.क्र.११२/का.१३, दिनांक २४.२.२००३.

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : मातंसं/प्र.क्र.३/६५/३९, दिनांक १८ जुलै, २००३.

८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : संप्रनि-२००२/प्र.क्र.१४/०२/बारा, दिनांक २.९.२००३.

९) शासन निर्णय क्रमांक, आदिवासी विकास विभाग क्रमांक शाआशा-२००३/ प्र.क्र.१२३/का.१३, दिनांक ३०.१.२००४.

१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमाक : मातंसं/नस्ती-०४/२२४/ ३९, दिनांक २६ मे, २००४.

११) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : मातंसं/नस्ती-०४/१४/३९, दिनांक ८ जुलै, २००४.

**प्रस्तावना :-** आदिवासी विकास विभागातर्फे आदिवासी विद्यार्थ्यांना आश्रमशाळेतून इ.१२ वी पर्यंतचे शिक्षण दिले जाते. विद्यमान शैक्षणिक क्षेत्रात परिस्थितीनुसार अमुलाग्र बदल होत असून त्याचाच भाग म्हणून सर्व प्रकारच्या शाळांमधून संगणक माहिती व तंत्रज्ञान याचे शिक्षण दिले जात असून शासनाने अभ्यासक्रमामध्ये संगणक विषयाला मान्यता दिलेली आहे. सर्वसाधारण शाळांतील विद्यार्थ्यांप्रमाणे आश्रमशाळामध्ये शिकणाऱ्या आदिवासी विद्यार्थ्यांना देखील संगणक विषयाचे ज्ञान व्हावे व त्याचा शैक्षणिक दर्जा उंचावला जावा, यासाठी शासनाने आश्रमशाळांमध्ये संगणक कक्ष निर्माण करण्याचा निर्णय संदर्भात नमूद केलेल्या अ.क्र.६ येथील शासन निर्णय, दिनांक २४.२.२००३ अन्वये निर्णय

घेतलेला आहे. त्याचप्रमाणे संगणक प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत शासकीय आश्रमशाळांतील इ. ८ वी ते १२ वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांना तसेच त्या आश्रमशाळांतील शिक्षकांना संगणक प्रशिक्षण देण्याचा निर्णय संदर्भात नमूद केलेल्या अ.क्र.९ येथील शासन निर्णय दिनांक ३०.१.२००४ अन्वये घेतलेला आहे.

२. या संदर्भी संगणक प्रशिक्षण कार्यक्रमाची अंमलबजावणी योग्य रित्या व्हावी व त्या प्रशिक्षणाचा लाभ आदिवासी विद्यार्थ्यांना तसेच शिक्षकांना पुरेपूर व्हावा म्हणून शासनाने यासाठी लागणारी संगणक यंत्र सामुग्री, फर्निचर इ.ची व्यवस्था अग्रक्रमाने केलेली आहे. उपलब्ध करुन दिलेल्या सोयीचा पूर्णतः लाभ आदिवासी विद्यार्थ्यांना मिळावा, असा शासनाचा हेतू आहे.

३. शासनाने शासन सेवेतील गट-अ, ब व क संवर्गातील पदांवर नियुक्ती करिता संगणक हाताळणे/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याकरिता वेळोवेळी योग्य ते निर्णय घेतलेले असून त्यामधील सर्व तरतूदी शासकीय, निमशासकीय कार्यालये, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका, महामंडळे, मंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाच्या अधिनस्त आणि शासनास संलग्न संस्था इ.मधील सर्व अधिकारी/ कर्मचाऱ्यांना लागू करण्यात आलेल्या आहेत. ही बाब लक्षात घेता, आदिवासी विकास विभागामार्फत चालविली जाणाऱ्या वसतिगृहातील अधीक्षकांना / कर्मचाऱ्यांना तसेच शासकीय आश्रमशाळांतील / कनिष्ठ महाविद्यालयातील तसेच स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविल्या जाणाऱ्या आश्रमशाळांमधील शिक्षकांना उपरोक्त सर्व तरतूदी आपोआपच लागू झालेल्या आहेत. तथापि, उपरोक्त संस्थांमधील बहुतांशी शिक्षकांनी संगणक प्रशिक्षणातील आवश्यक ती अर्हता अद्यापि प्राप्त करुन घेतलेली नाही, असे आढळून आलेले आहे. संगणक प्रशिक्षण अर्हतेबाबतच्या सर्व शासन निर्णयाचा उल्लेख संदर्भात देण्यात आला असून त्याकडे लक्ष वेधण्यात येत आहे. तथापि, त्यामधील काही प्रमुख बाबी खालीलप्रमाणे आहेत :-

(१) महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम, १९९९ च्या तरतूदीनुसार गट-अ, ब आणि क मधील सर्व शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांना संगणक हाताळणी वापराबाबतचे ज्ञान शासनाने आवश्यक अर्हता ठरविलेले आहे.

(२) संगणक अर्हता परिक्षेचे प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठीची अर्हता अनिवार्य आहे.

(३) शासन सेवेत असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आणि सेवेत प्रवेश करणाऱ्या उमेदवारांनी संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र सादर करण्याबाबत संदर्भातील अ.क्र.५ येथे नमूद केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक २०.७.२००२ मध्ये गट-अ, ब आणि क मधील शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून १ वर्षाच्या आत संगणक हाताळणी/वापराबाबतचे विहित प्रमाणपत्र प्राप्त न केल्यास संबंधितांच्या वेतनवाढी रोखण्यात येतील. तसेच नव्याने प्रवेश करणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून एक

वर्षाच्या आत सदर विहित प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर त्यांना सेवेत कायम करण्यात येणार नाही, अशी तरतूद आहे. म्हणून ज्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना प्रश्नाधीन परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सुट दिलेली आहे, असे वगळता इतर सर्व संबंधितांनी विहित अर्हता प्राप्त झाल्याचे प्रमाणपत्र न दिल्यास असे अधिकारी/कर्मचारी वेतनवाढी रोखण्यास पात्र आहेत. शिवाय, नव्याने सेवेत प्रवेश घेतलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी विहित कालावधीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर, त्यांचेविरुध्द वर नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करावयाची आहे. त्याचप्रमाणे विहित कालावधीनंतर ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक हाताळणी वापराबाबतचे विहित प्रमाणपत्र प्राप्त केलेले आहे, अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांचाच पदोन्नतीसाठी विचार करण्यात येईल.

(४) संगणक हाताळणी परिक्षेकरिता आकारण्यात आलेल्या शुल्कापैकी जास्तीत जास्त रु.३००/- इतकी रक्कम संगणक हाताळणी/वापराबाबतची विहित परिक्षा उत्तीर्ण करुन विहित प्रमाणपत्र सादर करणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना अदा करण्यात येईल. मात्र, संदर्भीय क्र.३ येथील दिनांक १०.७.२००० च्या शासन निर्णयातील परिच्छेद-७ मध्ये नमूद केलेली प्रशिक्षण खर्चासाठीची रु.२५००/- रक्कम देण्याची अट रद्द करण्यात येत आहे. अशी तरतूद करण्यात आली आहे.

वरील सर्व बाबी लक्षात घेता असे स्पष्ट होईल की आदिवासी विकास विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या शासकीय आश्रमशाळांतील तसेच स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविल्या जाणाऱ्या अनुदानीत आश्रमशाळांतील शिक्षकांना संगणक प्रशिक्षणाविषयीच्या अर्हतेमधून वगळण्यात आलेले नाही. त्यामुळे सर्व शिक्षकांनी शासनमान्य प्राप्त संस्थेमधून आवश्यक ती अर्हता विहित कालमर्यादेत मिळविणे त्यांचेवर बंधनकारक आहे. त्याचप्रमाणे संबंधित शिक्षकांनी संगणक विषयक आवश्यक ते ज्ञान प्राप्त करुन घेतल्यानंतर त्यांना आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना संगणक प्रशिक्षण देणे त्यांचेवर बंधनकारक आहे.

**शासन निर्णय** :- प्रस्तावनेत नमूद केलेल्या तपशीलाच्या अनुषंगाने शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

(१) सामान्य प्रशासन विभागाने संगणक प्रशिक्षण हाताळणी व अर्हता याविषयी निर्गमित केलेले सर्व शासन आदेश आदिवासी विकास विभागांतर्गत येणाऱ्या शासकीय व अनुदानीत आश्रमशाळांमधील तसेच कनिष्ठ महाविद्यालयातील सर्व शिक्षकांना लागू आहेत. तसेच यापुढे देखील भविष्यात प्राप्त होणारे शासनाचे आदेश आपोआपच सदर शिक्षकांना लागू राहतील.

(२) प्रस्तावनेत नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व अधिकारी / कर्मचारी तसेच शासकीय व स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविल्या जाणाऱ्या अनुदानीत आश्रमशाळा व कनिष्ठ महाविद्यालयामधील शासन सेवेत असलेल्या सर्व शिक्षकांनी सामान्य प्रशासन विभागाने ठरविलेल्या संगणक अर्हता विहित कालमर्यादेत प्राप्त

करुन घेणे आवश्यक होते. त्याचप्रमाणे शासकीय/ अनुदानीत आश्रमशाळेतील व कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक पदावर नव्याने नेमणूका होणाऱ्या सर्व शिक्षकांना नियुक्तीपूर्वी प्रश्नाधीन अर्हता प्राप्त करुन घेणे आवश्यक होते. ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी यानुसार अर्हता प्राप्त करुन घेतलेली नसेल, त्यांचेबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल :-

शासकीय आश्रमशाळा / वसतिगृहामध्ये नव्याने नियुक्त झालेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना दिनांक २६ मे, २००४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेली कुठलीही एक संगणक अर्हता परीक्षा धारण केल्याचे प्रमाणपत्र दि.२७.७.२००५ पुर्वी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर असे संगणक अर्हता प्रमाणपत्र विहित मुदतीपूर्वी उपलब्ध करुन दिले नाही तर अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांना उक्त कालावधी संपताच सामान्य प्रशासन विभागाच्या प्रस्तावनेतील दिनांक २०.७.२००२ च्या शासन निर्णयानुसार सेवेत कायम केले जाणार नाही. याबाबत त्याचे कोणतेही निवेदन विचारात घेतले जाणार नाही. अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून कोणतही सूट दिली जाणार नाही अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यास मुदतवाढ दिली जाणार नाही.

वर नमूद केलेल्या विहित १ वर्षाच्या कालावधीनंतर मात्र ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक हाताळणी/वापराबाबतचे विहित प्रमाणपत्र प्राप्त केलेले असेल अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांनाच सेवेत कायम केले जाईल. तसेच त्यांचा पदोन्नतीसाठी विचार करण्यात येईल. मात्र यापूर्वी सेवेत स्थायी पद धारण करीत असलेल्या कर्मचारी/अधिकारी यांनी संगणक हाताळणी वापराबाबतचे प्रमाणपत्र विहित मुदतीपूर्वी प्राप्त केले नाही तर अशा कर्मचारी/अधिकाऱ्यांचा पदोन्नतीबाबत विचार करण्यात येऊ नये. तसेच जे अधिकारी/कर्मचारी अशाप्रकारे संगणक अर्हता प्रमाणपत्र परिक्षा उत्तीर्ण असल्याचे प्रमाणपत्र सादर करणार नाहीत त्यांची पुढील वेतनवाढ रोखण्यात येईल. मात्र शासन निर्णय, दिनांक २.९.२००३ अन्वये ५० वर्षावरील शासकीय सेवकांना संगणक अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करण्यापासून सूट देण्यात आली आहे.

(३) आदिवासी विकास विभागांतर्गत स्वेच्छा संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानीत आश्रमशाळांमध्ये नव्याने नियुक्त करावयाच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी सुध्दा संगणक अर्हता प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण असण्याची अट लागू आहे. तसेच स्वेच्छा संस्थांमार्फत चालविण्यात येत असलेल्या अनुदानीत आश्रमशाळेत यापूर्वी सेवेत नियुक्त केलेल्या व स्थायी पद धारण करणाऱ्या कर्मचारी/अधिकाऱ्यांना संगणक हाताळणी वापराबाबतचे प्रमाणपत्र विहित मुदतीत प्राप्त केले नाही तर अशा कर्मचारी/अधिकारी यांना वेतनवाढ व पदोन्नती देण्यात येऊ नये. शासनाने संगणक चाचणीचे विहित प्रमाणपत्र सादर करण्याचा अंतिम दिनांक २०.७.२००५ निश्चित केला आहे.

(४) सर्व शासकीय आश्रमशाळांतील, अनुदानीत आश्रमशाळांतील तसेच कनिष्ठ महाविद्यालयातील संगणक अर्हता परिक्षा उत्तीर्ण असलेल्या शिक्षकांना प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर आश्रमशाळेतील अथवा संबंधित संस्थेतील विद्यार्थ्यांना संगणक प्रशिक्षण देणे बंधनकारक आहे.

(५) आदिवासी विद्यार्थ्यांना संगणक प्रशिक्षण देण्यासाठी सर्व आश्रमशाळांतील तसेच कनिष्ठ महाविद्यालयातील मुख्याध्यापकांनी/प्राचार्यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या शिक्षकांना विद्यार्थ्यांना संगणक प्रशिक्षण देण्याचे आठवडी वेळापत्रक ठरवून द्यावे. प्रत्येक प्रशिक्षित शिक्षक त्यांच्या आश्रमशाळेतील/महाविद्यालयातील आदिवासी विद्यार्थ्यांना विहित केलेल्या तासिकेनुसार संगणक प्रशिक्षण देत आहे, याची जबाबदारी संबंधित आश्रमशाळांच्या मुख्याध्यापकांवर/कनिष्ठ महाविद्यालयाच्या प्राचार्यांवर राहील.

(६) सर्व माध्यमिक आश्रमशाळा, कनिष्ठ महाविद्यालये यामधील प्रत्येक शिक्षक संगणक प्रशिक्षित असेल, याविषयीच्या नियोजनाची जबाबदारी ही संबंधित प्रकल्प अधिकाऱ्यांवर राहील.

(७) आश्रमशाळा, कनिष्ठ महाविद्यालये, अनुदानीत आश्रमशाळांमध्ये शिक्षकांचे संगणक प्रशिक्षण, विद्यार्थ्यांचे संगणक शिक्षण इ.बाबत सुनियोजित कार्यप्रणाली निश्चित करुन अशा शाळांतील प्रत्येक शिक्षक संगणक प्रशिक्षित आहेत व ते या शासन निर्णयानुसार आदिवासी विद्यार्थ्यांना संगणक प्रशिक्षण देत आहेत, याची खातरजमा दरमहा संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. संगणक प्रशिक्षण कार्यक्रमाचा आढावा दर दोन महिन्यांनी आयुक्त, आदिवासी विकास यांच्यामार्फत घेण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**( दि.वि. शिंदे )**
**अवर सचिव**

प्रत,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र १/२/, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागपूर.
अपार आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती, नागपूर,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-१७).
संचालक, लेखा व कोषागार, संगणक शाखा, मुंबई.
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग.
निवड नस्ती, कार्यासन-१३.